मार्गदर्शन करणारा दीपस्तंभ म्हणून यापुढें तो तेजास्वतेने तळपत राहील असा पुकारा झाला, आणि, 'हौतात्म्य गाजविणाऱ्या विचारवीरांनो नी कृतिवीरानो, तुम्ही ज्या संग्रामात लढलात आणि पडलात तो संग्राम यशस्वी झाला, उठा!' अशी घोषणा झाली की, त्यावेळी त्या पडून राहिलेल्या अस्थि आणि ती पडून राहिलेली रक्षा याच्यात फिरून तेज आणि चैतन्य| सळसळूं लागेल!

तोंवर प्रिय मित्रानो, रामराम!



हें पत्र स्वातंत्र्यवीर सावरकरानी आपल्या स्नेह्याना ब्रिस्टल तुरुंगातून पाठविलें. काव्य–प्रतिभा व देशभक्ति याचा संगम घडलेले सुंदर स्थळ म्हणून याचा साहित्यसाम्राट केळकरानी निर्देश केला आहे. स्वातंत्र्य प्राप्त होईपावेतों त्यानी आपल्या सर्व स्नेह्यांचा निरोप घेतला आहे नि स्वातंत्र्य प्राप्त होताच स्वातंत्र्याचा जयघोष निनादण्यासाठीं आपल्या अस्थीसुद्धा तेजानें भरून सळसळू लागतील अशी काव्यमय व ओजस्वी कल्पना यात त्यानी रंगवली आहे.

स्वातंत्र्यवीरांच्या पुण्याईनें त्याना 'याचि देहिं याची डोळा' स्वातंत्र्य पहावयास मिळालें. पण ज्या हुतात्म्याचे आधीच प्राण पंचमहा-

भूतात विलीन झाले आहेत, त्या सर्व हुतात्म्याच्या अस्थि आज आतां १० मेच्या 'हुतात्मा सांगता दिनी' भारताच्या पूर्ण स्वातंत्र्यात अुच्चस्वरानें पुकारा करतील.

'स्वातंत्र्य गाजविणाऱ्या विचारवीरानो नि कृतिवीरानो, तुम्ही ज्या संग्रामात लढलात आणि पडलात तो संग्राम यशस्वी झाला, अुठा!'

समाप्त